स्वामी रामानंद तीर्थ ग्रामीण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अंबाजोगाई संस्थेच्या विजसंच मांडणी कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : एसएचए-२०२२/प्र.क्र.१४१/प्रशा-१,
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१.
दिनांक : १२ मे, २०२३

वाचा : १. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.संवैशिवसं/ स्वारातीग्राशावैमअ/ विजसंचमांडणी/३५१४/आय-प/२१, दिनांक २८/०३/२०२२.
२. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.डीएमईआर-२००६९/१/२०२२,बजेट- दिनांक ०१/०२/२०२३.

शासन निर्णय :

विभागाच्या नियंत्रणाखालील स्वामी रामानंद तीर्थ ग्रामीण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अंबाजोगाई येथील या संस्थेतील वर्ग १ वर्ग ४ निवासस्थान इमारतीच्या विजसंच मांडणीचे उपयोगिता आयुर्मान संपुष्टात आलेले आहे. त्यामुळे सदर संस्थेत नव्याने वीज संच मांडणी करणे अत्यंत आवश्यक आहे. तद्नुषंगिक या कामाकरीता खालील विवरणपत्रात नमूद एकूण रु. ५,८१,६७,६४०/- (अक्षरी रुपये पाच कोटी, एक्क्याऐंशी लक्ष, सदुसष्ट हजार, सहाशे चाळीस फक्त) इतक्या रक्कमेच्या बांधकाम अंदाजपत्रकास पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | बांधकामाचे नाव | अंदाजित किंमत |
|---|---|---|
| १. | Est.No.OW/2739/2021-22 Providing Specified Repairs to Internal Electrification and External Electrification to Class 1, Class 2, Class 3. Class 4 Qtrs in the Premises of S.R.T.R.G.M.C.& H Ambajogai Dist. Beed. | ५,८१,६७,६४० |
| एकूण अंदाजित किंमत | | ५,८१,६७,६४० |

**अटी व शर्ती :-**

१) प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

२) तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक-२०१७/प्र.क्र.११/नियोजन-३, दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

३) प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दिनांक २४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

४) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३ /प्र.क्र.१७७ / तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

५) विद्युतीकरण कामाच्या कालावधीतच बाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

६) प्रस्तावित उपरोक्त विजसंच मांडणीचे काम ज्या इमारतींवर करण्यात येणार आहे त्या इमारती सदर काम करण्यासाठी सुरक्षित व मजबूत आहे, याबाबत सक्षम प्राधिका-याची मान्यता घेण्यात यावी.

७) विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, यादृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. सदर बांधकामासाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षात मंजूर होणाऱ्या निधीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एच-०८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन
१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग-१, उप विभाग-५ अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ (१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५१११९००३५१७१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO JOGDAND

Digitally signed by MAHADEO JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, pseudonym=85719993A847361CF1CE96786397786A408A4972, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO JOGDAND
Date: 2023.05.12 12:21:49 +05'30'

**(म.गि. जोगदंड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
२. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.

४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद.
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अंबाजोगाई, जि. बीड.
६. अधिष्ठाता, स्वामी रामानंद तीर्थ ग्रामीण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अंबाजोगाई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
८. निवडनस्ती (प्रशा-१).